GR20091004115858001-1201

लघुसिंचनाच्या विभाग/उपविभागांकडून बांधकाम विभागाची कामे करुन न घेण्याबाबत.

महाराष्ट्र शासन
ग्राम विकास व जलसंधारण विभाग,
परिपत्रक क्रमांक: लसिंपो-२०९२/प्र.क्र.२१/जल-१,
मंत्रालय, मुंबई-४०० ०३२, दिनांक ११ जानेवारी, १९९३.

## परिपत्रक

जिल्हा परिषदांकडे १०० हेक्टर पर्यंतच्या लघुसिंचनाच्या कामाकरिता विभाग व उपविभाग निर्माण करण्यात आलेली आहेत. तसेच जिल्हा परिषदांकडील लघुसिंचन कामाचा वाढता व्याप विचारात घेऊन अतिरिक्त कार्यालयीन अधिकचे विभाग/उपविभाग उपलब्ध करुन देण्याबाबत जिल्हा परिषदेकडून सतत मागणी करण्यात येत होती. यावर विचार करुन या विभागाच्या शासन निर्णय क्रमांक: लपायो-१०९२/प्र.क्र.४९/जल-१, दिनांक ८ जानेवारी, १९९३ नुसार २९ जिल्ह्यांत जलसंधारण विभागाच्या प्रशासकीय नियंत्रणाखाली लघुसिंचनाची [स्थानिक स्तर] कामे कार्यान्वित करण्याकरिता ११ विभाग व ४७ उप विभाग वर्ग करण्यात आली आहेत. शासनाच्या असे निदर्शनास आले की, काही जिल्ह्यांत जिल्हा परिषदांकडील लघुसिंचनाच्या विभाग/उपविभागांकडून बांधकाम विभागाचीही कामे करुन घेतली जातात.

लघुसिंचनाची विभाग/उपविभाग मुख्यत्वेकरुन लघुसिंचनाची कामे कार्यान्वित करण्याकरिता व ती कामे पूर्ण झाल्यानंतर त्याची दुरुस्ती / देखभाल करण्याकरिताच निर्माण केलेली आहेत. त्यामुळे ह्या विभाग/उपविभागांकडून बांधकाम विभागाची कामे करुन घेणे अपेक्षित नाही. मुळातच लघुसिंचन कामाचा व्याप मोठा असल्यामुळे व या विभाग/उपविभागांकडून बांधकाम विभागाची कामे कार्यान्वित करुन घेतल्यास त्याचा लघुसिंचनाच्या कामावर विपरित परिणाम होण्याचीही शक्यता नाकारता येत नाही. या सर्व गोष्टींचा विचार करुन असे आदेश देण्यात येत आहेत की, यापुढे जिल्हा परिषदेच्या लघुसिंचन विभाग/उपविभागांनी बांधकाम विभागाची कामे कार्यान्वित करु नयेत. याबाबत सर्व संबंधितांनी नोंद घ्यावी व वरील आदेशाचे काटेकोरपणे पालन करावे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

सुरेश पारधवाडकर,
उप सचिव, महाराष्ट्र शासन.

प्रति:-

१] माननीय मुख्य मंत्र्यांचे सचिव,
२] मा. मंत्री [जलसंधारण] / राज्यमंत्री [जलसंधारण],

[कृ.मा.प.]

शा.म.मु. रोटा/एच-८३८[व][१२००-१-९३]-७